**१४व्या वित्त आयोगाच्या न्यायव्यवस्थेचे सक्षमीकरण या प्रयोजनांतर्गत स्कॅनिंग व डिजिटायझेशन या योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्र. चौविआ २०१६/प्र.क्र.८४/का.०७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : ०६ जुलै, २०१७.

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्र.चौविआ १२१६/प्र.क्र.१०/का.०९, दिनांक ९.३.२०१६

२) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र.Spl./Comp./८१०/२०१६, दिनांक ३०.११.२०१६

३) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र.Spl./Comp./८३२/२०१६, दिनांक ७.१२.२०१६

४) दिनांक १२.१.२०१७ रोजी झालेल्या उच्चस्तरीय सनियंत्रण समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

५) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.९४/अर्थ-३, दि. ३०.०६.२०१७.

**<u>प्रस्तावना</u> :-**

१४ व्या केंद्रीय वित्त आयोगाने शिफारस केलेल्या "न्यायव्यवस्थेचे सक्षमीकरण" या प्रयोजनाकरिता सन २०१५-१६ ते २०१९-२० या पाच वर्षांच्या कालावधीकरिता महाराष्ट्र राज्यासाठी एकूण ११ घटकांसाठी रु.१०१४ कोटी इतक्या निधीची शिफारस केली आहे. वित्तीय वर्ष सन २०१५-१६ ते सन २०१९-२० या कालावधीकरिता स्कॅनिंग व डिजिटायझेशन या घटकाकरिता दिनांक २८.३.२०१६ रोजी झालेल्या उच्चस्तरीय संनियंत्रण समितीच्या बैठकीत रु. ४० कोटी इतका निधी प्रस्तावित करण्यात आला. तथापि, दिनांक १२.१.२०१७ रोजी १३व्या व १४व्या केंद्रीय वित्त आयोगाच्या संदर्भात झालेल्या उच्चस्तरीय संनियंत्रण समितीच्या बैठकीत सदर घटकाच्या रु. ४० कोटी इतक्या निधीच्या तात्पुरत्या आराखड्यास मान्यता देण्यात आली आहे. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांनी संदर्भ क्र. ३ अन्वये सादर केलेल्या सुधारित प्रस्तावांतर्गत सन २०१७ ते २०२० या वित्तीय वर्षांकरिता प्रत्येक वर्षी रु.१३.३३ कोटी इतकी तरतूद उपलब्ध करण्याबाबत प्रस्तावित केली होती. त्यानुषंगाने वित्तीय वर्ष सन २०१७-१८ करिता वित्त विभागास नवीन बाब प्रस्ताव सादर करण्यात आला असता, वित्त विभागाने सदर प्रस्तावास मंजूरी दिली असून रु.१३.३३ कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला. तथापि, सदर अर्थसंकल्पीत करण्यात आलेला निधी वितरीत करण्याबाबत प्रस्ताव पुनश्च वित्त विभागास मंजूरीसाठी पाठविण्यात आला असता वित्त विभागाने सदर योजनेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यतेच्या अटींच्या

अधीन राहून दिनांक १८.४.२०१७ च्या परिपत्रकानुसार ८०% च्या मर्यादेत निधी वितरीत करण्यास मंजूरी दिलेली आहे. त्यानुषंगाने सदर योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

१४व्या केंद्रीय वित्त आयोगाने शिफारस केलेल्या "न्यायव्यवस्थेचे सक्षमीकरण" या प्रयोजनांतर्गत प्रस्तावित केलेल्या एकूण ११ घटकांपैकी "स्कॅनिंग व डिजिटायझेशन" या योजनेस या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. त्याप्रित्यर्थ होणारा खर्च हा "मागणी क्र.जे-१, २०१४-न्यायदान, १०२-उच्च न्यायालये, (१२) तांत्रिक सहाय्य, (१२)(०२) स्कॅनिंग व डिजिटायझेशन (२०१४ ०५६६)-१७ संगणक खर्च"या उद्दिष्टाखाली अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा. यासंदर्भात संदर्भ क्र. ५ च्या शासन परिपत्रकाच्या अनुषंगाने वित्तीय वर्ष सन २०१७-१८ मधील निधी ७०% च्या मर्यादेत वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर झाले आहे त्याच प्रयोजनासाठीच खर्च करण्यात यावे.

४. हे ज्ञापन वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२००/अर्थ-११, दिनांक २०.५.२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१ उप विभाग-२ मधील अ.क्र.२७(अ) नियम क्र.७६ मधील २ व ३ या अटींच्या अनुषंगाने माहिती तंत्रज्ञान संचालनालयाच्या सल्ल्याने व त्यांनी वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार तसेच प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७०६१२०९५६१६१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Rajesh Trimbak Sandansing

Digitally signed by Rajesh Trimbak Sandansing
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=50c9a0c21f38a819ad7296928f99514b4466f259bd59983f2b0b04a37a0f2890, cn=Rajesh Trimbak Sandansing
Date: 2017.07.06 12:11:13 +05'30'

**( राजेश संदानसिंग )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**

१) महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,

२) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,

३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),-१/ २, मुंबई/नागपूर,

४) महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, मुंबई/नागपूर,

५) प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,

६) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

७) प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,

८) संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई,

९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

१०) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,

११) लेखा अधिकारी, मुंबई (२ प्रती),

१२) उप सचिव, वित्त विभाग, वित्त आयोग कक्ष, अर्थोपाय शाखा, व्यय-५, अर्थसंकल्प-११, मंत्रालय, मुंबई,

१३) सह सचिव/उप सचिव, का.४, ९, ११, १३, २२, २३ व २४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,

१४) निवड नस्ती.